**सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षात अकरावी व बारावी इयत्तेत असलेल्या मागासवर्गीय (अनु.जमाती वगळून) विद्यार्थ्यांच्या जातीच्या प्रमाणपत्राच्या तपासणीसाठी मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीबीसी/१०/२०१५/प्र क्र १०० /मावक**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक - ९ जुलै २०१५**

**वाचा** : १) शा.नि.वि.जा.भ.ज.इ.मा.व.वि.मा.प्रवर्ग कल्याण विभाग क्र.सीबीसी-२०००/२५२/प्र क्र.१/इमाव- ५, दिनांक २५.१.२०००

**प्रस्तावना :**

अनुसूचित जाती / विमुक्त जाती/भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग जातीच्या विद्यार्थ्यांनी विज्ञान शाखेच्या इयत्ता अकरावी व बारावी मध्ये शिकत असलेल्या सर्व विद्यार्थ्यांच्या जाती प्रमाणपत्राची वैधता तपासण्यासाठी संबधित शैक्षणिक संस्थांकडे अर्ज करण्याची अंतिम मुदत सन २०१३-२०१४ या शैक्षणिक वर्षात शासन निर्णय दिनांक २५ जानेवारी, २००० अन्वये माहे, ३० नोव्हेंबर पर्यंत होती. तथापि या कालावधीमध्ये सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षात इयत्ता बारावीमध्ये शिकत असलेल्या तसेच यापूर्वीच्या काळात बारावी इयत्तेत (विज्ञान शाखेत) उत्तीर्ण झालेल्या काही मागासवर्गीय विद्यार्थ्यांनी वरील निर्धारित मुदतीत अर्ज सादर केले नसल्याने किंवा काही अपरिहार्य कारणामुळे त्यांना ते शक्य झाले नसल्याने, अशा विद्यार्थ्यांपैकी ज्या विद्यार्थ्यांची जाती प्रमाणपत्राची तपासणी न झाल्यामुळे त्यांचे शैक्षणिक वर्ष वाया जाऊ नये म्हणून मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षात इयत्ता बारावी विज्ञान शाखेत शिकत असलेल्या अनुसूचित जाती, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांनी दिनांक २५ जानेवारी, २००० मध्ये विहित मुदतीत जाती प्रमाणपत्राच्या तपासणीसाठी अर्ज सादर केले नाहीत व सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षात वैद्यकीय, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र व औषध निर्माणशास्त्र या अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेऊ इच्छितात अशा विद्यार्थ्यांनी आपल्या जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन घेण्यासाठी खालीलप्रमाणे वाढीव मुदतीबाबत कार्यपध्दती प्रस्तावित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | जे विद्यार्थी सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षात विज्ञान शाखेच्या इयत्ता १२ वी मध्ये शिकत आहेत, त्यांनी संबधित महाविद्यालयामार्फत आपले अर्ज संस्थेच्या प्राचार्याकडे सादर करावयाचा अंतिम दिनांक | दि. २० जुलै, २०१५ |
| २) | शैक्षणिक संस्थेने असे प्रस्ताव संबधित सहाय्यक आयुक्त समाजकल्याण यांचेकडे पाठवावयाचा अंतिम दिनांक | दि. २७ जुलै २०१५ |
| ३) | सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी संबधित विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याचा अंतिम दिनांक | दिनांक ३१ जुलै २०१५ |
| ४) | समितीने अर्ज तपासून द्यावयाचा अंतिम दिनांक | दिनांक ३० सप्टेंबर २०१५ |

२. शैक्षणिक संस्थेने तसेच सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांच्याकडे प्राप्त पडताळणी प्रकरणे एकत्रितरित्या अंतिम तारखेला न पाठविता, ते जसे प्राप्त होतील तसे तातडीने पुढे सादर करावीत.

३. शासन असेही आदेश देत आहे की, जर या उशीरा आलेल्या अर्जापैकी इयत्ता १२ वी मध्ये काही विद्यार्थ्यांचा जातीचा दावा संशयास्पद असल्याने दावा तपासण्यास उशीर झाला व पर्यायाने संबधित विद्यार्थ्यांस वैद्यकीय, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र व औषधी निर्माण शास्त्र अभ्यासक्रमासाठी महाविद्यालयात पुढील शैक्षणिक वर्षामध्ये पदवी अभ्यासक्रमासाठी प्रवेशाबाबत काही अडचणी निर्माण झाल्यास, अथवा **प्रवेश मिळू शकला नाही तर त्याची जबाबदारी जाती प्रमाणपत्र तपासणी समिती वा अथवा शासनावर रहाणार नाही असे संबधित विद्यार्थ्याकडून लेखी घेऊन नंतरच असे अर्ज तपासणीसाठी स्विकारावेत.**

४. माहिती जनसंपर्क महासंचालनालयाने या शासन निर्णयास राज्यस्तरावरील प्रमुख दैनिके, जिल्हा स्तरीय/ स्थानिक दैनिके, आकाशवाणी व दूरदर्शनवरुन प्रसिध्दी देण्याची व्यवस्था करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१७०४०१४९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Uttam Shivram Lonare

Digitally signed by Uttam Shivram Lonare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivram Lonare
Date: 2015.07.10 17:05:22 +05'30'

**(उ .शि लोणारे)**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
३) संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे
४) सर्व विभागीय आयुक्त (महसुल), अतिरिक्त आयुक्त (महसुल)
५) सर्व विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती १,२,व ३
६) सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी,
७) सर्व प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण विभाग / सर्व सहाय्यक आयुक्त समाजकल्याण
८) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
९) संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई
१०) संचालक, आयुर्वेद संचालनालय, वरळी, मुंबई
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१२) यांना विनंती की त्यांनी सदर शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी दयावी.
१३) प्रत, प्रधानसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
१४) अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय मुंबई
१६) त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शैक्षणिक संस्थांना वरील विद्यार्थ्यांचे जाती प्रमाणपत्र पडताळणीचे अर्ज स्वीकारुन आवश्यक त्या प्रमाणपत्रासह संबधित जाती प्रमाणपत्र समितीकडे विहित मुदतीत अर्ज सादर करण्याच्या सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात. तसेच या सूचना वेबसाईटवर सुध्दात्यांच्या स्तरावरुन प्रसिध्द कराव्यात.
१७) निवड नस्ती (मावक) सा.न्या,